कोषागारातून रोख देय अनुदान
२२१५,पाणी पुरवठा व स्वच्छता अनुसूचित
जाती उपयोजना लेखाशीर्ष (२२१५ १२९१)
अंतर्गत निधी वितरण

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः राग्रापे- २०१६/प्र.क्र.५७/पापु-१०**
सातवा मजला,गोकूळदास तेजपाल रूग्णालय इमारत संकुल,
लोकमान्य टिळक मार्ग ,क्रॉफर्ड मार्केट जवळ, मुंबई-४००००१
तारीख: ६ मार्च, २०१७

वाचा

१) **सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग यांचे पत्र क्रमांकः विघयो २०१५/प्र.क्र.१८७/विघयो, दि.५.३.२०१६**
२) **वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांकः अर्थसं-२०१६/प्र.क्र. ८९ /अर्थ-३ दि. २०.४.२०१५**

**प्रस्तावना**

मागणी क्र. Y-०२ ,लेखाशीर्ष २२१५,पाणी पुरवठा व स्वच्छता, १०२ ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रम, ०२ जिल्हा परिषदांना योजनांतर्गत अनुदाने, अनुसूचित जाती उपयोजना (०२)(०९) नळाद्वारे पाणीपुरवठा योजना, ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) (२२१५ १२९१) या लेखाशीर्षाखाली जिल्हा परिषद, जालना यांना मागणीनुसार निधी वितरणाचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता

**शासन निर्णय**

मागणी क्र. Y-०२ ,लेखाशीर्ष २२१५,पाणी पूरवठा व स्वच्छता, १०२ ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रम, ०२ जिल्हा परिषदांना योजनांतर्गत अनुदाने, अनुसूचित जाती उपयोजना (०२)(०९) नळाद्वारे पाणीपुरवठा योजना, ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) (२२१५ १२९१) याखाली जिल्हा परिषद जालना यांना त्यांचे मुख्य कार्यकारी अधिकारी यांचेमार्फत योजनांसाठी रु. २.८०५ लक्ष व देखभाल दुरुस्तीसाठी रु. ०.४९५ लक्ष या प्रमाणे एकूण रु. ३.३० लक्ष (रुपये तीन लक्ष तीस हजार फक्त ) इतकी रक्कम यासोबतच्या विवरणपत्राननुसार अर्थसंकल्प वितरण प्रणालीद्वारे पुढील अटी व शर्तीच्या अधीन राहून रोख मंजूर व मुक्त करण्यात येत आहे.

अ) जिल्हा परिषद,जालना यांनी अनुदान ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आले आहे त्या विनिर्दिष्ट प्रयोजनासाठीच खर्च करावे.

आ) जिल्हा परिषद जालना यांनी या अनुदानातून केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे ठेवावेत.

इ) वरील अटी/ शर्तीची जिल्हा परिषदेकडून पूर्तता होत आहे, हयाची शासनाला खात्री करुन घेता यावी म्हणून महालेखापाल महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर यांना तसेच या विभागातील प्राधिकृत केलेल्या अधिकाऱ्यास लेखा परिक्षणाकरिता जिल्हा परिषदांची पुस्तके व लेखे पाहण्याचा अधिकार राहील, महालेखापाल यांना त्यांचे काम योग्य तऱ्हेने पार पाडता यावे म्हणून जिल्हा परिषद संपूर्ण मदत व सुविधा पुरवतील.

ई) शासन परिपत्रक ग्राम विकास विभाग क्र. आरसीएन १०८९/सीआर ३०२७/२८, दिनांक ५.९.१९९० मधील सूचनेप्रमाणे या अनुदानाच्या खर्चाचा महालेखापाल कार्यालयात नोंदविलेल्या खर्चाशी ताळमेळ घालावा. ताळमेळाचा अहवाल विहीत दिनांकांना जिल्हा परिषदेने विभागीय आयुक्त (विकास शाखा) यांना व या विभागातील कार्यासन क्र. पा.पु. १० व पा.पु. २० ला सादर करावे. तसेच, झालेल्या खर्चाची माहिती दरमहा व त्रैमासिक अहवालात पुढील महिन्याच्या १० तारखेपर्यंत सादर करावा. त्याचप्रमाणे उपयोगिता प्रमाणपत्र महालेखापाल कार्यालयास सादर करावी व त्याची एक प्रत पा.पु. १० कार्यासनास पाठवावी. तसेच खर्चाची नोंद ऑनलाईन भरण्याची दक्षता घ्यावी.

यावर होणारा खर्च मागणी क्र. Y-०२ लेखाशिर्ष २२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता, १०२ ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रम, ०२ जिल्हा परिषदांना योजनांतर्गत अनुदाने, अनुसूचित जाती उपयोजना (विशेष घटक योजना) (०२) (०९) नळाद्वारे पाणीपुरवठ्याची योजना, ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) (२२१५ १२९१) या लेखाशिर्षाखाली खर्ची घालावा व तो सन २०१६-१७ ह्या वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक क्र. २०१७०११७१२१४३६०६२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vasant Bhimrao Mane

Digitally signed by Vasant Bhimrao Mane
DN: CN = Vasant Bhimrao Mane, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Under Secretary
Date: 2017.03.06 18:03:45 +05'30'

( वसंत भि.माने )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल, महाराष्ट्र १ मुंबई (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता)
२. महालेखापाल, महाराष्ट्र २ नागपूर (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता)
३. संबंधित विभागीय आयुक्त.
४. मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद जालना.
५. मुख्य लेखा व वित्त अधिकारी,जिल्हा परिषद,जालना.
६. संचालक , पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, नवी मुंबई, बेलापूर
७. अधिक्षक अभियंता,विभागीय भारत निर्माण कक्ष,औरंगाबाद.
८. कार्यकारी अभियंता,ग्रामीण पाणी पुरवठा विभाग,जिल्हा परिषद,जालना.
९. जिल्हा कोषागार अधिकारी,जालना.
१०. कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, जालना
११. मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, मुंबई
१२. मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा,
१३. वित्त विभाग(व्यय ३) मंत्रालय ,मंबई ३२
१४. नियोजन विभाग/१४४३,मंत्रालय ,मंबई ३२
१५. उपसचिव, सामाजिक न्याय विभाग,(विघयो) मंत्रालय, मुंबई ३२
१६. आयुक्त, समाज कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे / सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण, जालना
१७. जिल्हा समाज कल्याण अधिकारी,जालना
१८. पाणी पुरवठा व स्वच्छता विभागातील कार्यासने क्र. पा.पु.०४, पा.पु.२०.
१३.निवडनस्ती पा.पु. १०

# विवरणपत्र

शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्र. २०१६/प्र.क्र.५७ /पापु१०, दि. ६ मार्च,२०१७ चे सहपत्र-
लेखाशीर्ष (२२१५ १२९१)

(रूपये लाखात)

| अ.क्र | जिल्हा परिषद | एकूण तरतूद | सन २०१६-१७ या अर्थिक वर्षात वितरीत करण्यात येत असलेला निधी | | |
|---|---|---|---|---|---|
| | | | योजना(मजीप्रा) | देखभाल व दुरूस्ती | एकूण (४+५) |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | जालना | ३.३० | २.८०५ | ०.४९५ | ३.३० |

(रुपये तीन लक्ष तीस हजार फक्त )

Vasant Bhimrao Mane

Digitally signed by Vasant Bhimrao Mane
DN: CN = Vasant Bhimrao Mane, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Under Secretary
Date: 2017.03.06 18:04:11 +05'30'

**(वसंत भि. माने )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन